“महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुर्न:स्थापना संनियंत्रण समिती” स्थापन करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: आरएपीए-२०१५/प्र.क्र.१९४/र-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० ऑगस्ट, २०१५

संदर्भ : १) शासन निर्णय क्रमांक: आरपीए-२००६/प्र.क्र.१(१)/र-१, दिनांक १७/३/२००६
२) शासन निर्णय क्रमांक:आरएपीए-१०१४/प्र.क्र.३७२/र-१, दिनांक १३ मार्च, २०१५.

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम १९९९ हा दिनांक १ एप्रिल, २००२ पासून अंमलात आलेला आहे. केंद्र शासनाने फेब्रुवारी, २००४ मध्ये राष्ट्रीय पुनर्वसन धोरण २००३ जाहिर केले. या धोरणानुसार राज्य शासनाचे पुनर्वसन धोरण केंद्राने जाहिर केलेल्या पुनर्वसन धोरणाशी सुसंगत असण्याच्या उद्देशाने राज्याच्या पुनर्वसन धोरणात आवश्यक ते बदल करुन त्याची अंमलबजावणी करण्याकरिता शासन निर्णय क्रमांक आरपीए-२००६/प्र.क्र.१(१)/र-१, दिनांक १७/३/२००६ अन्वये महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण या नावाने मा.मंत्री (पुनर्वसन) यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण ही कायस्वरुपी यंत्रणा निर्माण करण्यात आलेली आहे. त्यानंतर राष्ट्रीय पुनर्वसन धोरण २००७ राज्यात लागू करण्यात आले व आता भूमीसंपादन /पुनर्वसन व पुर्नस्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३ दिनांक १ जानेवारी, २०१४ पासून अंमलात आलेला आहे. तसेच राज्यात नोंव्हेबर २०१४ पासून नव्याने मंत्रीमंडळाची स्थापना झालेली आहे. या अनुषंगाने शासन निर्णय दिनांक १७/३/२००६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरणाचे पुर्नगठण संदर्भांकित क्र.२ च्या दिनांक १३/३/२०१५ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आले. भूमीसंपादन पुनर्वसन व पुर्न:स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३ च्या कलम ५० पोटकलम-१ अनुसार या अधिनियमाखाली पुनर्वसन व पुर्न:स्थापना योजनांच्या आराखडयाच्या अंमलबजावणीचे पुर्ननिरीक्षण व संनियंत्रण करण्यासाठी “महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुर्न:स्थापना संनियंत्रण समिती” स्थापन करणे आवश्यक आहे. त्यानुसार “महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण” या कायमस्वरुपी यंत्रणेऐवजी “महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुर्न:स्थापना संनियंत्रण समिती” असा बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण” या नावाने मा.मंत्री (पुनर्वसन) यांच्या अध्यक्षतेखाली “महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण” ही कायम स्वरुपी यंत्रणा स्थापन करण्यात आली होती. या यंत्रणेऐवजी आता “महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुर्न:स्थापना संनियंत्रण समिती” असा बदल या शासन निर्णयान्वये करण्यात येत आहे.

**सदर संनियंत्रण समितीची रचना खालीलप्रमाणे असेल :-**

अध्यक्ष : मा.मंत्री (पुनर्वसन)
सदस्य : मा.मंत्री (महसूल)
मा.मंत्री (जलसंपदा)
मा.मंत्री (वित्त)

मा.मंत्री (उद्योग)
मा.मंत्री (उर्जा)
मा.मंत्री (वने)

मा.मंत्री (प्राधिकरणाचे सदस्य) यांना आवश्यकता भासल्यास ते त्यांचे विभागाच्या सचिवांना महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुर्नःस्थापना संनियंत्रण समितीच्या बैठकीस हजर राहण्यास प्राधिकृत करु शकतील.

**निमंत्रित प्रधान सचिव/सचिव** :- प्रधान सचिव (वने-भूसंपादन कक्ष)
प्रधान सचिव (महसूल)
प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग
सचिव (उर्जा)
सचिव (उद्योग)
सचिव (व्यय), वित्त विभाग
सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग

ज्या विभागाशी संबधित प्रकल्पाचा आराखडा मंजूरीसाठी संनियंत्रण समितीच्या बैठकीत ठेवलेला असेल त्या बैठकीपूरते संबधित विभागाचे सचिव, निमंत्रित प्रधान सचिव / सचिव असतील.

**संनियंत्रण समितीचे मुख्य कार्यकारी अधिकारी** : सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल वन विभाग.

**अशासकीय निमंत्रित सदस्य** :- राज्याच्या प्रत्येक महसूली विभागातील एक याप्रमाणे सहा विभागातील सहा अशासकीय व्यक्तींना संनियंत्रण समितीवर "निमंत्रित सदस्य" म्हणून नेमण्यात येईल. त्यांच्या नेमणूकीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

**संनियंत्रण समितीचे अधिकार** :-

१) राज्य शासनाचा विभाग/अंगीकृत उपक्रम महामंडळ अथवा केंद्र शासनाचा विभाग/ अंगीकृत उपक्रम महामंडळ अथवा अन्य कोणत्याही सरकारी/निमसरकारी संस्था/स्थानिक स्वराज्य संस्था यांनी हाती घेतलेल्या प्रकल्पांमुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाची कामे संनियंत्रण समिती मार्फत करण्यात येतील. यासाठी संबंधित प्रकल्प संस्थेकडून आवश्यक ती आर्थिक तरतूद संनियंत्रण समितीकडे उपलब्ध करण्यात येईल. सदर आर्थिक तरतूद उपलब्ध होण्यासाठी महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुर्नःस्थापना संनियंत्रण समिती व संबंधित प्रकल्प संस्था यांच्यामध्ये करार करण्यात येईल.

२) पुनर्वसनाच्या कामाच्या अनुषंगाने धोरणात्मक निर्णय घेणे, पुनर्वसना संबंधीचे नियम तयार करणे.

३) एखादया प्रकल्पामुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाचे काम संनियंत्रण समितीच्या यंत्रणेमार्फत करणे किंवा शासनाच्या अन्य संबंधित विभागाच्या यंत्रणेमार्फत करणे किंवा आवश्यकतेप्रमाणे नियमानुसार खाजगी यंत्रणेचा सहभाग घेणे याबाबतचे अंतिम आर्थिक तथा प्रशासकीय निर्णय घेणे, संबंधित यंत्रणेला निर्देश देणे व घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करणे.

४) ज्या संस्थेने/विभागाने प्रकल्प हाती घेतलेला आहे, त्यांच्याशी करार करुन त्या प्रकल्पामुळे बाधित झालेल्या व्यक्तींना पुनर्वसनाच्या कामाची जबाबदारी पुनर्वसन संनियंत्रण समिती स्वतःकडे घेईल. संनियंत्रण समिती त्यांच्या नियंत्रणाखालील पुनर्वसन यंत्रणेमार्फत पुनर्वसनाची आवश्यक कामे पार पाडेल.

**संनियंत्रण समितीच्या नियंत्रणाखालील पुनर्वसन यंत्रणा** :

महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुर्नःस्थापना संनियंत्रण समितीची संपूर्ण पुनर्वसन यंत्रणा ही महसूल विभागाचा एक भाग म्हणून कार्यरत असेल. त्याबाबतचे यापुर्वी निर्गमित केलेले आदेश यापूढेही तसेच कार्यन्वित राहतील.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१५०८२११३३३३९१९१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Prasannakumar Sadanand Thakur

Digitally signed by Prasannakumar Sadanand Thakur
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prasannakumar Sadanand Thakur
Date: 2015.08.21 13:39:14 +05'30'

( प्र. स. ठाकूर )
कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,
४) मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,
५) सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
६) सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
७) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
८) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
९) सर्व मंत्रालयीन विभाग , मंत्रालय, मुंबई,
१०) महालेखापाल (लेखापरीक्षा/ले.अ.) महाराष्ट्र-१ मुंबई,
११) महालेखापाल (लेखापरीक्षा/ले.अ.) महाराष्ट्र-२ नागपूर,
१२) सर्व विभागीय आयुक्त,
१३) सर्व पाटबंधारे विकास महामंडळाचे व्यवस्थापकीय संचालक,
१४) सर्व जिल्हाधिकारी,
१५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१६) सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी,
१७) महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई,
१८) जलसंपदा विभाग (५ प्रतीसह), मंत्रालय, मुंबई.
१९) निवड नस्ती, कार्यासन र-१.